**शासन मान्य संगणक संस्थातून प्रशिक्षण घेतलेले अधिकारी/कर्मचारी चाचणी परीक्षा अनुत्तीर्ण झाल्यास त्यांचेकडून एका हप्त्यात (One Stroke) वसुली करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
परिपत्रक क्रमांक प्रशि १००२/प्रक्र २६०/२००२/३९(३)
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
दिनांक: ५ जुलै, २००२

**परिपत्रकः-**

ज्या शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांनी शासन मान्य ५ संगणक संस्थेपैकी संस्थेतून संगणक प्रशिक्षण घेऊन प्रशिक्षण खर्च व प्रोत्साहनात्मक रक्कम घेतलेली आहे अथवा अशा रक्कमेची मागणी केलेली आहे; त्यांनी महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळामार्फत घेतली जाणारी चाचणी परीक्षा (Confirmatory Test) उत्तिर्ण करुन विहित प्रमाणपत्र शासनास सादर करण्याबाबत शासन निर्णय क्र. प्रशिक्षण १०००/१४३/३९, दि. १०.७.२०००, अन्वये आदेश निर्गमित केलेले आहेत.

२. या शासन निर्णयातील तरतुदीनुसार संबंधित कर्मचारी/अधिकाऱ्यांना ही चाचणी परीक्षा उत्तिर्ण करण्यासाठी ३ संधी दिलेल्या असून जर ते प्रथम संधीत परीक्षा अनुत्तिर्ण झाले तर त्यांचेकडून रु. १०००/- वसुल करावयाचे आहेत, द्वितीय संधीत अनुत्तिर्ण झाल्यास आणखी रु. १०००/- वसुल करावयाचे आहेत व तृतीय व अंतिम संधीत परीक्षा अनुत्तिर्ण झाल्यास त्यांना प्रशिक्षण खर्च व प्रोत्साहनात्मक रक्कमेपोटी दिलेली उर्वरित संपूर्ण रक्कम वसुल करावयाची आहे. जर आशी रक्कम त्या कर्मचाऱ्यास दिलेली नसेल तर संबंधित कर्मचारी ज्या संधीत परीक्षा उत्तिर्ण करेल त्या संधीनंतर,अनुत्तिर्ण संधीची रक्कम वजा करुन उर्वरीत रक्कमेची प्रतिपूर्ती करावयाची आहे. या अनुषंगाने असे कळविण्यात येते की, ज्या अधिकारी/कर्मचाऱ्यांनी संगणक प्रशिक्षण खर्च व प्रोत्साहनात्मक रक्कम दि. १०.७.२००० च्या निर्णयापूर्वीच घेतलेली असेल त्या पैकी जर काही अधिकारी/कर्मचारी प्रथम,द्वितीय किंवा तृतीय संधीत चाचणी परीक्षा अनुत्तिर्ण झाले तर त्यांचेकडून प्रत्येक संधीनंतर रु. एक हजार आशी रक्कम वसुल न करता तृतीय संधीनंतर एका हप्त्यात (One Stroke) संपूर्ण रक्कम वसुल करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(नितीन गद्रे)
**उप सचिव तथा संचालक (मातं)**

**प्रति,**
राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा) मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा) मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,(विधान परिषद /विधान सभा),मुंबई,
महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई,
महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र , नागपूर,
महालेखापाल -१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १, मुंबई,
महालेखापाल -१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र २, नागपूर
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
लेखा कोष भवन वांद्रे (पू.) मुंबई,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषद/महानगरपालिकांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व नगरपरिषदांचे मुख्याधिकारी,
महालेखापाल -२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र , नागपूर,
सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई,
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने

-x-x-

GR-20020731171005000104